सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम" (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत अभिसरणांतर्गत करावयाच्या पुर्व पावसाळी कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- सावि-२०२४/प्र.क्र.२०/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दि.२१ फेब्रुवारी, २०२५

वाचा-:

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-सावि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दि.२८.०७.२०२३.

२) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक -सावि-२०२४/प्र.क्र.१०(भाग-१)/फ११, दि.०४.०३.२०२४.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.१८.०४.२०२४, दि.०३.०५.२०२४, दि.१०.०५.२०२४, दि.२८.०५.२०२४, दि.०१.०७.२०२४, दि.०३.०७.२०२४, दि.२६.०७.२०२४, दि.१४.०८.२०२४, दि.०४.०९.२०२४, दि.२७.०९.२०२४, दि.११.१०.२०२४, दि.१८.१२.२०२४, दि.०३.०१.२०२४ व दि.३०.०१.२०२५.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -सावि-२०२४/प्र.क्र.३५/फ-११, दि.२७.०६.२०२४, दि.०९.०७.२०२४ व दि.१८.१२.२०२४.

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४

६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १२.०२.२०२५

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, यांचे क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र. २५ (भाग -१)/१००७/२०२४-२५, दि.३१.०१.२०२५ रोजीचे पत्र.

८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, यांचे क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र. २५ (भाग -१)/१०३६/२०२४-२५, दि.०६.०२.२०२५ रोजीचे पत्र.

प्रस्तावना:

वन आणि वनेत्तर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सन २०२४-२५ करीता "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या राज्य योजनेंतर्गत रु.६०५६०.०० लक्ष इतका निधी (०२-मजूरी अंतर्गत रु.३७६८९.६० लक्ष, १३-कार्यालयीन खर्च अंतर्गत रु.०.०१ लक्ष, २१-पुरवठा व सामग्री अंतर्गत रु.२०८३९.३८ लक्ष, २४- पेट्रोल, तेल व वंगण अंतर्गत रु.०.०१ लक्ष आणि ५०-इतर खर्च अंतर्गत रु.२०३१.०० लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

०२. वित्त विभागाच्या वाचा क्रमांक ५ दि.२५.०७.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२४-२५ च्या प्रथम नऊ माहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० व ७० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे (बीम्स) वितरीत केला जाईल. सदर मासिक विवरणपत्रानुसार निधी एप्रिल ते डिसेंबर, २०२४ या कालावधीमध्ये पुढे / मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) देण्यात आली आहे. निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविण्यात आलेल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात असे नमुद करण्यात आले आहे. तसेच, वाचा क्रमांक ६ येथील वित्त विभागाच्या दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये ०२-मजूरी या उद्दिष्टांकरीता ९५ % मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे (बीम्स) वितरीत केला जाईल. तसेच, इतर उदिष्टाकरिता निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनासह व उपलब्ध निधी खर्च झाल्याची खात्री करून आवश्यकतेनुसार नियोजन विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/ आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागाकडे दिनांक १८ फेब्रुवारी, २०२५ पर्यंत सादर करण्यात यावेत अश्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

०३. वाचा क्रमांक १ येथे नमूद दि.२८.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वनीकरण तसेच वन क्षेत्रातील मृद व जलसंधारणाची सर्व कामे ही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व वन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे अभिसरण करून घेण्यास व उर्वरित फरकाची रक्कम योजनेंतर्गत उपलब्ध तरतुदीमधून अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या राज्य योजनेंतर्गत करण्यात येणारी कामे सुध्दा अभिसरणांतर्गत करणे आवश्यक आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील विविध दिनांकीत शासन निर्णयान्वये रु.**३७५९९.६९ लक्ष** इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

०४. वाचा क्रमांक ६ व ७ येथील विविध पत्रांन्वये “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” (४४०६ ०४९२) या अंतर्गत सन २०२४-२५ या वर्षाकरीता महत्त्वाचे रस्ते/ रेल्वे/ कालवे/दुतर्फा वृक्ष लागवडीच्या अभिसरण योजनेंतर्गत पूर्व पावसाळी कामांसाठी एकूण **रु.२१.४८ लक्ष** इतका निधी वितरीत करण्याबाबत विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात (००)(०६)“सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” (४४०६ ०४९२) अंतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांसाठी मंजूर अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत तरतुदीमधून खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार निधी वितरित व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| रस्ता दुतर्फा कामाचा तपशील (अतिरिक्त मागणी) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वनवृत्त | वनविभाग | कामाची बाब | कि.मी | पूर्व पावसाळी कामांकरीता अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत आवश्यक निधी (रू.लाखात) | | |
| | | | | | ०२- मजुरी | २१- साहित्य पुरवठा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | **छत्रपती संभाजीनगर** | नांदेड | **पूर्व पावसाळी** | ४४ | ६.५८ | २.८२ | ९.४० |
| | | बीड | | ७२ | ८.४६ | ३.६२ | १२.०८ |
| **एकूण** | | | | **११६** | **१५.०४** | **६.४४** | **२१.४८** |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार वन वृत्तांमधील “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या करीता महत्त्वाचे रस्ते/ रेल्वे/ कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवडीच्या अभिसरण योजनेंतर्गत पूर्व पावसाळी कामांसाठी एकूण **रु.२१.४८ लक्ष** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी हा संबंधित योजनांतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीताच खर्च करण्यात यावा. तसेच सदर अभिसरणांतर्गत पूर्व पावसाळी कामांना निधी वितरीत करताना वन वृत्त/विभाग निहाय कामांचा तपशिल तपासूनच सदर निधी वितरीत करण्याची कार्यवाही अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावी.

४. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत

करण्यात आलेल्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्यात आली आहे याबाबतची दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे वर्ष २०२४-२५ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. सदर निधी वितरीत करताना करण्यात येत असलेली कामे ही वाचा क्रमांक १ येथील दि.२८.०७.२०२३ मधील तरतुदी, वाचा क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील सुचना, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचना तसेच सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेल्या अंदाजपत्रकानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याची खातरजमा करून निधी वितरणाची कार्यवाही नियंत्रक अधिकारी यांनी करावी. तसेच सदर निधी खर्च करतांना सुध्दा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांचे पालन करण्याबाबतच्या सुचना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून संबंधीतांना देण्यात याव्यात.

६. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२४-२५ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

७. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या वाचा क्रमांक ५ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

८. वन वृत्त/विभाग निहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/ झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

९. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**

**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**

**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२)**

**०२- मजूरी २१- साहित्य पुरवठा**

१०. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.०१.०४.२०२४ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२२१११४८३६७०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP RAJENDRA SATPUTE

Digitally signed by PRATAP RAJENDRA SATPUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=46e55cdbf3321ecaa0de879cc768619afcdbda90e6691b3baf2255384355942f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47A54DFAE5D873AD7624C29CACBF61D571ADA2CBEECE334AB2E56A179C9FF19F, cn=PRATAP RAJENDRA SATPUTE
Date: 2025.02.21 11:49:26 +05'30'

**(प्रताप राजेंद्र सातपुते)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.